ठाणे, पुणे ,नाशिक,धुळे,नंदूरबार,जळगांव,अहमदनगर,
नांदेड, यवतमाळ, गडचिरोली,चंद्रपूर व अमरावती या
जिल्हयातील आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाड
व भाजीपाला लागवडीची योजना - सन २०११-१२
मध्ये राबविण्यास प्रशासकिय व वित्तीय मान्यता देणेबाबत

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र. फलयो २०११/प्र.क्र. ९७ /९ अे
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांकः १६ सप्टेंबर २०११

वाचाः--१) कृषि आयुक्तालय यांचे पत्र जा.क्र.कृषिआ/फ़लो-२/आदिवासी प्रस्ताव /११-१२/१०६६/११ ,दिनांक ११ एप्रिल २०११

**प्रस्तावना :-**

राज्यातील १२ जिल्हयांतील आदिवासी भागातील कुपोषणाचे प्रमाण कमी करण्याच्या उद्देशाने पौष्टिक आहार निर्माण करण्यासाठी आदिवासी कुटुंबाच्या घराभोवती असलेल्या परसबागेत विशिष्ट भाजीपाला व फळांची निवड करुन लागवड करण्यास प्रोत्साहन देण्याची फळझाडे व भाजीपाला पिकाची योजना राज्यात सन २००३-०४ पासून राबविण्यात येत आहे. ही योजना सन २०११-१२ मध्ये राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात आदिवासी भागात कुपोषणाचे प्रमाण जास्त असल्याने त्यांचे आहारात जीवनसत्व व इतर आवश्यक पोषकद्रव्ये उपलब्ध होण्याच्या हेतूने या कुपोषित भागासाठी पौष्टिक आहार योजना तयार करण्यात आली आहे. परसबागेत उपयुक्त फळे व भाजीपाल्याचा समावेश करुन आहार अन्नद्रव्याच्या दृष्टीने परिपूर्ण करता येणे शक्य होईल यास्तव राज्यातील १२ जिल्हयातील आदिवासी भागातील कुपोषणाचे प्रमाण कमी करण्याच्या उद्देशाने पौष्टिक आहार निर्माण करण्यासाठी आदिवासी कुटुंबाच्या घराभोवती असलेल्या परसबागेत विशिष्ट भाजीपाला व फळांची निवड करुन लागवड करण्यास प्रोत्साहन देण्याची फळझाडे व भाजीपाला पिकाची योजना सन २०११-१२ मध्ये राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. त्यासाठी रुपये ७.५० लाख (रुपये सात लाख पन्नास हजार फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. ही योजना राज्यातील ठाणे, पुणे,नाशिक ,धुळे नंदूरबार ,जळगांव,अहमदनगर, नांदेड यवतमाळ, गडचिरोली, चंद्रपूर व अमरावती या जिल्हयातील आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत राबविण्यात यावी.

**२. उद्दिष्ट :-**

सन २०११-१२ या वर्षी ४००० लाभार्थ्यांच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला पिकांची लागवड करण्याचे उद्दिष्ट आहे. सदर उद्दिष्ट साध्य करण्यासाठी फळझाडे व भाजीपाल्याची कलमे/रोपे ही शासकिय रोपवाटिका कृषि विद्यापीठ रोपवाटिका अथवा नोंदणीकृत खाजगी रोपवाटिकांमधून पुरविण्यात येतील. तसेच बियाणे शासकीय रोपवाटिका कृषि विद्यापीठ, राष्ट्रीय बीज निगम, राज्य बियाणे महामंडळ यांचेकडून उपलब्ध करुन देण्यात येतील व अवजारांमध्ये फावडे,टिकाव किंवा कुदळ व फावडे एकत्रित असलेले अवजार इत्यादिचा समावेश राहिल. यापैकी

किंमतीत बसणारे अवजार महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ/महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ/महाराष्ट्र राज्य पणन महामंडळातर्फे घेवून पुरवठा करण्यात येईल.लाभार्थीकडे स्वतःची अवजारे असल्यास त्यास अवजाराऐवजी कलमे/रोपे तसेच बी-बियाण्याचा पुरवठा एकूण रु.२५०/- तरतुदीच्या मर्यादेत आणि त्यांचे परसबागेत लागवड योग्य असलेल्या क्षेत्राच्या मर्यादेच्या अधीन राहून देण्यात येईल.

**३. लाभार्थी निवड :-**

आदिवासी क्षेत्रातील ज्या कुपोषणग्रस्त गांवामधील आदिवासी कुटुंबाकडे शेतजमीन किंवा परसबाग उपलब्ध असेल अशा आदिवासी लाभार्थींची सन २०११-१२ या वर्षी आदिवासी कुटुंबाची निवड करण्यात येईल. राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य व पोषण मिशनच्या बैठकांतील निर्णयांची अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने लाभार्थी निवड करताना ज्या आदिवासी कुटुंबांत कुपोषीत बालके असतील अशा आदिवासी शेतक-यांना या योजनेचा प्राधान्याने लाभ देण्यात यावा.मात्र यापुर्वी लाभ घेतलेल्या लाभधारकांना या योजनेचा लाभ पुन्हा देण्यात येणार नाही.

**४. या कार्यक्रमांतर्गत लावावयाची फळझाडे/भाजीपाला :-**

१) चिकू २)कागदी लिंबू ३)पेरु ४)पपई ५)शेवगा ६) कढीपत्ता ७)आळू ८) मेथी ९)लाल भोपळा १०) पालक ११) दुधी भोपळा १२) मागणीनुसार इतर भाजीपाला जसे दोडका, . गवार, वांगी व इतर

**५. लाभ द्यावयाचे साहित्य व सामुग्री पुरवठा :-**

लाभार्थीकडे स्वतःची अवजारे नसल्यास प्रती लाभार्थी रु. १५० /- किंमतीची फळझाडे/भाजीपाला लागवड साहित्य पुरवठा व रु. १००/- चे अवजारांचा संच पुरविण्यात येईल. .लाभार्थीकडे स्वतःची अवजारे असल्यास त्यास अवजाराऐवजी कलमे/रोपे तसेच बी-बियाण्याचा पुरवठा एकूण रु.२५०/- तरतुदीच्या मर्यादेत आणि त्यांचे परसबागेतील लागवड योग्य असलेल्या क्षेत्राच्या मर्यादेच्या अधीन राहून देण्यात येईल.

**६. अंमलबजावणी करणारी यंत्रणा :-**

सदर कार्यक्रम संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, यांचेमार्फत राबविण्यात येईल.

**७. लाभार्थी प्रशिक्षण :-**

रोपांची लागवड, जोपासना, फळे काढणी व भाजीपाला यांचे खाद्य पदार्थ तयार करणे इत्यादीबाबत प्रशिक्षण ग्रामस्तरावर देण्यात येईल.

**८.संनियंत्रण , आढावा व मुल्यमापन :-**

सबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी या योजनेचा गावनिहाय आढावा घेऊन लागवडीच्या संबंधीचा अहवाल विभागीय कृषि सहसंचालकामार्फत संचालक (फलोत्पादन) यांना सादर करतील. फलोत्पादन संचालक, पुणे हे अहवाल शासनास सादर करतील .

**९. योजनेंतर्गत तपासणी :-**

या योजनेंतर्गत लागवड केलेल्या परसबागेतील लागवडीची तपासणी खालीलप्रमाणे मापदंडानुसार करण्यात यावी.

| | | |
|---|---|---|
| १. | विभागीय कृषि सहसंचालक | ०.५ टक्के |
| २. | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | १ टक्का |
| ३ | उप विभागीय कृषि अधिकारी | २ टक्के |
| ४. | तालुका कृषि अधिकारी | ५ टक्के |
| ५ | मंडळ कृषि अधिकारी | २५ टक्के |

६.  कृषि पर्यवेक्षक  १०० टक्के

**१०. आहरण व संवितरण अधिकारी:-**

या कार्यक्रमासाठी संचालक, फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. मंजूर निधीचे संबधित जिल्हयांना संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा.

**११**. या योजनेसाठी होणारा खर्च रु.७.५० लाख (रु.सात लाख पन्नास हजार फक्त) सन २०११-१२ या वर्षाकरीता मंजूर व अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीनुसार खालील लेखाशिर्षातून भागाविण्यात यावा.

**"मागणी क्र. डी-३,**
**२४०१-पीक संवर्धन,**
**११९, बागायती व भाजीपाला पिक**
**(०१ ) (२७) आदिवासी जिल्हयात परसबाग योजना**
**(२४०१ ३६५४)**
**३३ अर्थसहाय्य."**

**१२.** हे आदेश आदिवासी विभागाच्या क्र.३५९दि.८/८/११, नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनोपचरिक क्रमांक १७७/११/व्यय १दि.३/९/२०११च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१३. हा शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०११०९१६१४२४३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि.म.कोकणे )
सह सचिव , महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.प्रधान सचिव,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय मुंबई
आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे. (१० प्रती)
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई
फलोत्पादन संचालक,कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे. (१० प्रती)
सर्व विभागीय आयुक्त ,
सर्व जिल्हाधिकारी,
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन महामंडळ, पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,

सर्व उपविभागीय कृषि अधिकारी,
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
महालेखापाल-१-२(लेखा व अनुज्ञेयता) (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व कार्यासने कृषी व पदुम विभाग.
माहिती व जनसंपर्क संचालनालय (प्रसिध्दिसाठी)
मा.लोक आयुक्त / मा. उपलोकआयुक्त , नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२.
पुणे महानगर नियोजन समिती, विभागीय आयुक्तालय आवार निवाडा शाखा, पहिला मजला,पुणे-१.
निवडनस्ती